**पशुस्वास्थ व रोग नियंत्रण (LH & DC) या केंद्र सहाय्यित योजनेंतर्गत ॲस्कॅड (ASCAD-Assistance to States for Control of Animal Disease) या योजनेच्या राज्यातील अंमलबजावणीस प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : केंपुयो- २०२१/ प्र.क्र. ०९/ पदुम-४,**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, विस्तार, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक :- ०२ डिसेंबर, २०२१.**

**वाचा** - :१. केंद्र शासनाच्या पशुसंवर्धन व दुग्धव्यवसाय विभागाचे विविध ०३ निधी वितरण आदेश क्र. के- ११०५३ (५३११) / ३३/ २०१७- एलएच, कृषी भवन, नवी दिल्ली, दि.१९.११.२०१९

२. केंद्र शासनाच्या पशुसंवर्धन व दुग्धव्यवसाय विभागाच्या पशुस्वास्थ व रोग नियंत्रण (LH & DC) योजनेच्या dahd.nic.in या संकेतस्थळावर निर्गमित केलेल्या सर्वसाधारण सूचना.

३. कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाचा शासन निर्णय क्र. कुक्कुट- २०२१/ प्र.क्र.०६/ पदुम-४, दि. २०.०१.२०२१.

**प्रस्तावना :-**

पशुस्वास्थ व रोग नियंत्रण (Livestock Health & Disease Control) या केंद्र सहाय्यित योजनेंतर्गत ॲस्कॅड (ASCAD-Assistance to States for Control of Animal Disease) ही केंद्र सहाय्यित / पुरस्कृत योजना महाराष्ट्र राज्यात सन २००३-०४ पासून राबविण्यात येत आहे. या योजनेमध्ये समाविष्ट असणाऱ्या विविध उपघटकांसाठी केंद्र हिस्सा व राज्य हिश्याचे प्रमाण वेगवेगळे असून, ते ६०:४०, ५०:५० व १००% असे आहे. वाचा क्र. १ येथील विविध ०३ निधी वितरण आदेशान्वये केंद्र शासनाने सन २०१९-२० मध्ये सर्वसाधारण, अनुसूचित जाती उपयोजना आणि प्रथमत:च जनजाती क्षेत्र उपयोजनेंतर्गत राज्यास निधी वितरीत केलेला आहे.

या योजनेंतर्गत सुरुवातीच्या कालावधीत केवळ सर्वसाधारण योजनेंतर्गत व तद्नंतर सर्वसाधारण व अनुसूचित जाती उपयोजनेंतर्गत केंद्र शासनाकडून राज्यास निधी वितरीत होत असल्याने, ॲस्कॅड योजनेंतर्गतच्या विविध कार्यक्रमांसाठी सर्वसाधारण व अनुसूचित जाती उपयोजनेंतर्गत १०० व ६० टक्के केंद्र हिस्सा आणि त्यास देय समरुप ४० टक्के राज्य हिश्यासाठी स्वतंत्र लेखाशिर्ष मंजूर करुन घेण्यात आलेले आहेत. तथापि, केंद्र शासनाकडून सन २०१९-२० मध्ये जनजाती क्षेत्र उपयोजनेंतर्गत प्रथमत:च राज्यास निधी वितरीत झालेला असल्याने व जनजाती क्षेत्र उपयोजनेंतर्गत विभागाकडे लेखाशिर्ष उपलब्ध नसल्याने, वितरीत केलेला निधी अखर्चित राहिलेला आहे.

सदर केंद्र सहाय्यित / पुरस्कृत ॲस्कॅड योजनेच्या राज्यातील अंमलबजावणीस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णयः-**

केंद्र सहाय्यित / पुरस्कृत पशुस्वास्थ व रोग नियंत्रण (LH & DC) या योजनेंतर्गत ॲस्कॅड (ASCAD-Assistance to States for Control of Animal Disease) या सर्वसाधारण, अनुसूचित जाती उपयोजना व जनजाती क्षेत्र उपयोजनेच्या राज्यातील अंमलबजावणीस याव्दारे, शासनाची प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

या योजनेंतर्गत खालील नमुद विविध कार्यक्रमांव्दारे पशुधनामधील आणि कुक्कुट पक्षातील आर्थिकदृष्टया महत्वाच्या रोगांवर नियंत्रण ठेवण्यासाठी राज्यातील सर्व जिल्हयांत विविध रोग प्रतिबंधक लसीकरण करणे, पशुसंवर्धन विभागातील अधिकारी व कर्मचारी यांचे प्रशिक्षण आयोजित करणे, पशुरोग सर्वेक्षण, शेतकरी व पशुपालकांचे मेळावे आयोजित करणे, लोकजागृती व प्रसिध्दी कार्यक्रम, रोग निदान प्रयोगशाळांचे आधुनिकीकरण, जंतनिर्मुलन करणे आणि बर्ड फ्ल्यू, ग्लँडर्स इ. सारख्या रोग प्रादुर्भावामध्ये शेतकरी व पशुपालकांकडील जाणीवपूर्वक नष्ट केलेले कुक्कुट व इतर पक्षी, कुक्कुट अंडी, पक्षीखाद्य व अश्व इ. च्या प्रित्यर्थ केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांन्वये शेतकऱ्यांना नुकसान भरपाई अदा करणे आणि बर्ड फ्ल्यू रोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत ऑपरेशनल कॉस्ट या उपघटकांची अंमलबजावणी, केंद्र व राज्य हिश्याच्या देय व प्रत्यक्ष उपलब्ध निधीस अनुसरुन करण्यात यावी.

**१) आर्थिकदृष्टया महत्वाच्या रोगांचे लसीकरणः-**

मोठया जनावरांतील घटसर्प, फऱ्या व थायलेरीओसीस इ. तसेच, शेळया-मेंढयांमधील काळीपुळी (ॲन्थ्रॅक्स), देवी, आंत्रविषार आणि कुक्कुट पक्षांमधील राणीखेत, देवी या आर्थिकदृष्टया महत्वांच्या रोगांवर नियंत्रण ठेवण्यासाठी राज्यातील सर्व जिल्हयात पशुवैद्यकीय संस्थांमार्फत केंद्र शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना विचारात घेवून विविध रोग प्रतिबंधक लसीकरण करण्यात यावे. यासाठी केंद्र शासनाचे ६० टक्के व राज्य शासनाचे ४० टक्के अर्थसहाय्य देय राहील.

| | |
|---|---|
| लेखाशिर्षः- मागणी क्र. डी-४<br>२४०३, पशुसंवर्धन,<br>१०१, पशुवैद्यकीय सेवा व पशुआरोग्य,<br>(०८) (२९), ॲस्कॅड अंतर्गत महत्वाच्या मानवी संसर्गक्षम अशा पशुरोगांचे नियंत्रण व निर्मुलन (६० टक्के केंद्र हिस्सा) (कार्यक्रम)<br>संकेतांक २४०३२३८६ | लेखाशिर्षः- मागणी क्र. डी-४<br>२४०३, पशुसंवर्धन,<br>१०१, पशुवैद्यकीय सेवा व पशुआरोग्य,<br>(०८) (२४), ॲस्कॅड अंतर्गत आर्थिक नुकसान होणाऱ्या पशुरोगांचे नियंत्रण व निर्मुलन (४० टक्के राज्य हिस्सा) (कार्यक्रम)<br>संकेतांक २४०३२३५९ |
| लेखाशिर्षः- मागणी क्र. एन-३<br>२४०३, पशुसंवर्धन,<br>१०१, पशुवैद्यकीय सेवा व पशुआरोग्य,<br>(०१) (२०), आर्थिक दृष्टया महत्वाच्या पशुरोगांवर नियंत्रण (अनुसूचित जाती उपयोजना) (६० टक्के केंद्र हिस्सा) (कार्यक्रम)<br>संकेतांक २४०३डी७९४ | लेखाशिर्षः- मागणी क्र. एन-३<br>२४०३, पशुसंवर्धन,<br>१०१, पशुवैद्यकीय सेवा व पशुआरोग्य,<br>(०१) (२१), आर्थिक दृष्टया महत्वाच्या पशुरोगांवर नियंत्रण (अनुसूचित जाती उपयोजना) (४० टक्के राज्य हिस्सा) (कार्यक्रम)<br>संकेतांक २४०३डी८०२ |

**२) प्रशिक्षण व कार्यशाळा आयोजित करणे :-**

जनावरांमधील विविध रोग प्रादुर्भाव, त्या अनुषंगाने करण्यात येणाऱ्या उपाययोजना, सर्वेक्षण करणे, लसीकरण इ. बाबतची अद्ययावत माहिती पशुसंवर्धन विभागातील अधिकाऱ्यांना अवगत करण्यासाठी केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे प्रशिक्षण वर्ग आयोजित करण्यात यावे. यासाठी केंद्र शासनाचे १०० टक्के अर्थसहाय्य देय राहील.

| |
|---|
| लेखाशिर्ष:- मागणी क्र. डी-४<br>२४०३, पशुसंवर्धन,<br>१०१, पशुवैद्यकीय सेवा व पशुआरोग्य,<br>(०८) (३१), पशुसंवर्धन क्षेत्रातील कर्मचाऱ्यांकरीता पशुसंवर्धन विस्तार विषयक चर्चासत्र प्रशिक्षण कार्यक्रम आयोजित करणे (१०० टक्के केंद्र हिस्सा) (कार्यक्रम)<br>संकेतांक २४०३२४०१ |

**३) सर्वेक्षण, सनियंत्रण व पुर्व अंदाज बांधणे :-**

राज्यात विविध रोगांच्या प्रादुर्भावाच्या अनुषंगाने तेथील सर्वेक्षण करुन रक्त, रक्तजल, शेण, मुत्र व उती नमुने संकलीत करुन रोग अन्वेषण विभाग, पुणे / विभागीय रोग अन्वेषण प्रयोगशाळा येथे तपासणी करणे. तसेच, राज्यातील विविध भागातही नियमितपणे सर्वेक्षण करुन त्या ठिकाणांची भौगोलिक परिस्थिती व हवामानाची स्थिती लक्षात घेऊन रोग प्रादुर्भावाचे पुर्व अंदाज बांधण्यात यावे. यासाठी केंद्र शासनाचे ६० टक्के व राज्य शासनाचे ४० टक्के अर्थसहाय्य देय राहील.

| | |
|---|---|
| लेखाशिर्ष:- मागणी क्र. डी-४<br>२४०३, पशुसंवर्धन,<br>१०१, पशुवैद्यकीय सेवा व पशुआरोग्य,<br>(०८) (२८), ॲस्कॅड अंतर्गत पशुरोग, संनिरिक्षण व पूर्वानुमान (६० टक्के केंद्र हिस्सा) (कार्यक्रम)<br>संकेतांक २४०३२३७७ | लेखाशिर्ष:- मागणी क्र. डी-४<br>२४०३, पशुसंवर्धन,<br>१०१, पशुवैद्यकीय सेवा व पशुआरोग्य,<br>(०८) (०५), ॲस्कॅड अंतर्गत पशुरोग, पूर्वानुमानाचे संनिरिक्षण (४० टक्के राज्य हिस्सा) (कार्यक्रम)<br>संकेतांक २४०३०२५८ |

**४) माहिती व जनसंपर्क मेळावे आयोजित करणे :-**

शेतकऱ्यांना व पशुपालकांना जनावरांमधील विविध आर्थिकदृष्टया महत्वाच्या रोगांची माहिती, त्यांचे नियंत्रण व निर्मुलन करण्यासाठी करावयाच्या उपाययोजना, पशु-पक्ष्यांमधील रोग प्रतिबंधक लसीकरण तसेच, पशुसंवर्धन विभागांतर्गत राबविण्यात येणाऱ्या विविध योजनांची माहिती प्रसिध्दी माध्यमाव्दारे, जाहिरात प्रसिध्द करुन तसेच, तालुका व जिल्हास्तरावर संपर्क मेळावे आयोजित करुन पशुपालकांमध्ये व शेतकऱ्यांमध्ये जागृती निर्माण करण्यात यावी. यासाठी केंद्र शासनाचे ६० टक्के व राज्य शासनाचे ४० टक्के अर्थसहाय्य देय राहील.

| | |
|---|---|
| लेखाशिर्ष:- मागणी क्र. डी-४<br>२४०३, पशुसंवर्धन,<br>१०१, पशुवैद्यकीय सेवा व पशुआरोग्य,<br>(०८) (३०), ॲस्कॅड अंतर्गत माहिती, शिक्षण व लोक सहभाग मेळावे आयोजित करणे (६० टक्के केंद्र हिस्सा) (कार्यक्रम)<br>संकेतांक २४०३२३९५ | लेखाशिर्ष:- मागणी क्र. डी-४<br>२४०३, पशुसंवर्धन,<br>१०१, पशुवैद्यकीय सेवा व पशुआरोग्य,<br>(०८) (४२), ॲस्कॅड अंतर्गत माहिती, शिक्षण व लोक सहभाग मेळावे आयोजित करणे (४० टक्के राज्य हिस्सा) (कार्यक्रम)<br>संकेतांक २४०३२७६२ |

**५) विभागीय रोग अन्वेषण प्रयोगशाळांचे बळकटीकरण :-**

राज्यातील ७ विभागीय रोग अन्वेषण प्रयोगशाळांचे आधुनिकीकरण करणे व विविध रोगांचे रोग निदान करण्यासाठी आवश्यक साहित्य, उपकरणे, रसायने, किट्स इ. खरेदी करणे. यासाठी केंद्र शासनाचे ६० टक्के व राजय शासनाचे ४० टक्के अर्थसहाय्य देय राहील.

| | |
|---|---|
| लेखाशिर्ष:- मागणी क्र. डी-४<br>२४०३, पशुसंवर्धन,<br>१०१, पशुवैद्यकीय सेवा व पशुआरोग्य,<br>(०८) (०६), ॲस्कॅड अंतर्गत विभागीय पशुरोग अन्वेषण प्रयोगशाळेचे आणि जिल्हा प्रयोगशाळेचे बळकटीकरण व आधुनिकिरण करणे (६० टक्के केंद्र हिस्सा) (कार्यक्रम)<br>संकेतांक २४०३१६५७ | लेखाशिर्ष:- मागणी क्र. डी-४<br>२४०३, पशुसंवर्धन,<br>१०१, पशुवैद्यकीय सेवा व पशुआरोग्य,<br>(०८) (२७), ॲस्कॅड अंतर्गत विभागीय पशुरोग अन्वेषण प्रयोगशाळेचे आणि जिल्हा प्रयोगशाळेचे बळकटीकरण व आधुनिकिरण करणे (४० टक्के राज्य हिस्सा) (कार्यक्रम)<br>संकेतांक २४०३२३६८ |

**६) अचानक उद्भवणाऱ्या तसेच, विदेशी आजारांचा प्रतिबंध करणे :-**

या उपयोजने अंतर्गत खालीलप्रमाणे विविध २ उपघटकांचा समावेश राहील.

अ) अचानक उद्भवणारे पशुरोग तसेच, विदेशी आजारांचा प्रतिबंध करण्यासाठी लोकजागृती व प्रसिध्दीकरीता तसेच सर्वेक्षण करण्याच्या दृष्टिने आवश्यक नियमित रक्त, रक्तजल, शेण, मुत्र व उती नमुने / रोगग्रस्त प्राण्यांचे अवषेश व अनुषंगीक साहित्य गोळा करणे, रिंग लसीकरण करणे याकरीता केंद्र शासनाचे १०० टक्के अर्थसहाय्य देय राहील.

| |
|---|
| लेखाशिर्ष:- मागणी क्र. डी-४<br>२४०३, पशुसंवर्धन,१०१, पशुवैद्यकीय सेवा व पशुआरोग्य,<br>(०८), पंचवार्षिक योजनेअंतर्गत योजना<br>(०८) (५४), ॲस्कॅड अंतर्गत अचानक उद्भवणारे तसेच विदेशी आजारांवर नियंत्रण ठेवण्यासाठी लोकजागृती, प्रसिध्दी व सर्वेक्षण करणे (केंद्र हिस्सा १०० टक्के) (कार्यक्रम)<br>संकेतांक २४०३डी९९२ |

आ) अचानक उद्भवणारे पशुरोग तसेच, बर्ड फ्ल्यू, ग्लँडर्स इ. रोगाचा प्रादुभाव आटोक्यात आणण्याकरीता कुक्कुट पक्षी, अश्ववर्गीय प्राणी जाणीवपूर्वक नष्ट (Cull) करणे, संक्रमित प्राण्यांना बाजुला काढून टाकणे, पक्षीखाद्य, अंडी नष्ट करणे या प्रित्यर्थ संबंधित शेतकऱ्यांना नुकसान भरपाई तसेच, या प्रक्रियेसाठी आवश्यक ऑपरेशनल कॉस्ट यासाठी केंद्र शासनाचे ५० टक्के व राज्य शासनाचे ५० टक्के अर्थसहाय्य देय राहील.

| | |
|---|---|
| लेखाशिर्ष:- मागणी क्र. डी-४<br>२४०३, पशुसंवर्धन,<br>१०१, पशुवैद्यकीय सेवा व पशुआरोग्य,<br>(०८), पंचवार्षिक योजनेअंतर्गत योजना<br>(०८) (५५), ॲस्कॅड अंतर्गत अचानक उद्भवणारे तसेच विदेशी आजारांवर नियंत्रण ठेवण्यासाठी शेतकऱ्यांना ऑपरेशनल खर्चासह नुकसान भरपाईची अदायगी (केंद्र हिस्सा ५० टक्के) (कार्यक्रम)<br>संकेतांक २४०३ई००१ | लेखाशिर्ष:- मागणी क्र. डी-४<br>२४०३, पशुसंवर्धन,<br>१०१, पशुवैद्यकीय सेवा व पशुआरोग्य,<br>(०८), पंचवार्षिक योजनेअंतर्गत योजना<br>(०८) (५६), ॲस्कॅड अंतर्गत अचानक उद्भवणारे तसेच विदेशी आजारांवर नियंत्रण ठेवण्यासाठी शेतकऱ्यांना ऑपरेशनल खर्चासह नुकसान भरपाईची अदायगी (राज्य हिस्सा ५० टक्के) (कार्यक्रम)<br>संकेतांक २४०३ई०१२ |

**७) गाय व म्हैस वर्गातील जंत नियंत्रण करणे:-**

राज्यातील पशुधन निरोगी, सुदृढ व उत्पादनक्षम रहावे तसेच, त्यांची रोगप्रतिकारशक्ती वाढविण्याकरिता त्यांच्या पोटातील जंत नियंत्रण करण्यासाठी लसीकरण कार्यक्रमापूर्वी एकात्मिक जंत निर्मुलन कार्यक्रमांतर्गत पशुधनास जंतनाशक औषधांचा पुरवठा करण्यात यावा. यासाठी केंद्र शासनाचे ६० टक्के व राज्य शासनाचे ४० टक्के अर्थसहाय्य देय राहील.

**जनजाती क्षेत्र उपयोजनेंतर्गत आवश्यक नवीन लेखाशिर्ष उपलब्ध करुन घेऊन ते स्वतंत्रपणे कळविण्यात येतील.**

केंद्र शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना व योजनेच्य अंमलबजावणीसाठी प्रत्यक्ष वितरीत झालेला निधी यास अधीन राहून सदरच्या कार्यक्रमाची राज्यात अंमलबजावणी करण्यात यावी.

राज्यस्तरावर आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे तर विभागीय स्तरावर संबंधित विभागाचे प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन हे योजनेचे अंमलबजावणी अधिकारी राहतील. योजनेच्या स्वरुपानुसार जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त , जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद हे क्षेत्रीय स्तरावर योजनेची अंमलबजावणी करतील. तसेच, राज्य स्तरावरील संस्था जसे की, रोग अन्वेषण विभाग, पुणे पशुजैव पदार्थ निर्मिती संस्था, पुणे व राज्यस्तरीय प्रशिक्षण संस्था, पुणे हे योजनेच्या विविध घटकांच्या अनुषंगाने योजनांची अंमलबजावणी करतील.

सदर केंद्र पुरस्कृत योजनेच्या राज्यातील अंमलबजावणीसाठी आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी आवश्यक त्या सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रिय स्तरावर तात्काळ निर्गमित कराव्यात.

या योजनेसाठी केंद्र शासनाकडून प्राप्त होणारा निधी खर्ची पडल्यानंतर त्याचे विहीत प्रपत्रातील उपयोगिता प्रमाणपत्र भौतिक साध्य अहवालासह केंद्र शासनास सादर करण्यासाठी राज्य शासनास सादर करण्यात यावे.

सदर शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य, आदिवासी विकास, नियोजन आणि वित्त विभागाच्या सहमतीने तसेच, वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र. ४७३/ २०२१/ व्यय-२, दि. २८.११.२०२१ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२२९१५५५३८७३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

DR. SANJAY VISHWANATHRAO DOIJODE

Digitally signed by DR. SANJAY VISHWANATHRAO DOIJODE
DN: CN = DR. SANJAY VISHWANATHRAO DOIJODE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = AGRICULTURE AND ADF DEPARTMENT
Date: 2021.12.29 15:56:58 +05'30'

**(डॉ. संजय वि. डोईजोडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. मा.उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.मंत्री (पशुसंवर्धन व दुग्धव्यवसाय) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव, वित्त विभाग (कार्यासन व्यय-२ / अर्थ-१५) मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग (कार्यासन- १४३१) मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव, आदिवासी विका विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
११. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, जुने वळू संगोपन केंद्र, बडा हनूमान मंदिराजवळ, सिव्हिल लाईन्स, तेलंगखेडी, नागपूर.
१२. संचालक (संशोधन) महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर.
१३. प्रधान महालेखापाल (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता) - १/२, महाराष्ट्र, मुंबई , नागपूर.
१४. सर्व प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन
१५. पशुसंवर्धन सहआयुक्त, भारतरत्न अटलबिहारी वाजपेयी राज्यस्तरीय रोग अन्वेषण विभाग, पुणे.
१६. पशुसंवर्धन सहआयुक्त, पशु जैव पदार्थ निर्मीती प्रयोगशाळा, औंध, पुणे.
१७. सर्व जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त
१८. पशुसंवर्धन उपायुक्त, गुणनियंत्रण प्रयोगशाळा, गोरेगाव, मुंबई.
१९. सर्व जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद
२०. अवर सचिव (पदुम-३), कक्ष अधिकारी (पदुम-१, २ व १६), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१. निवड नस्ती पदुम-४.